श्री. यशवंत गंगाराम पतिंगराव यांना मा.न्यायालयाच्या आदेशानुसार न्या.कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः काव्यआ-६६१५/प्र.क्र.१६२/आस्था.१०,

बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई-४०० ०३२,
तारीख: १४ ऑगस्ट,२०१५.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल,२००१

२) शासन निर्णय क्रमांकः विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.जा. क्र.२०१०/ विशा /जिप/सीआर-११/ आस्था.१/कावि-८३७,दि. ९/६/२०१५.

३) शासन निर्णय क्रमांकः मा.उच्च न्यायालयाचे रिट याचिका क्र.८७५६/२०१५ मध्ये दिलेले दि.२५/२/२०१५ चे आदेश.

प्रस्तावना :-

श्री.यशवंत गंगाराम पतिंगराव हे रोजंदारीवर जिल्हा परिषद, परभणी येथे दि.१/६/१९८३ पासून कार्यरत होते. त्यांना दि.१/६/१९८६ ला सेवेतून काढून टाकले म्हणून त्यांनी मा.कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे तक्रार (युएलपी) क्र.१२६/१९८६ दाखल केली. यावर मा.कामगार न्यायालयाने दि.११/७/१९९० रोजी खालील प्रमाणे निर्णय दिला.

१) तक्रार मान्य केली.

२) प्रतिवादी म्हणजे मुख्य कार्यकारी अधिकारी हे अनुचित कामगार प्रथा अन्वये कृती करीत होते.

३) श्री.पतिंगराव, यांना सेवेत पुनर्स्थापित करुन मागील सेवा जोडून देणे तसेच दि.१/६/१९८६ पासूनचे वेतन देखील देण्याचे आदेश दिले.

२. या आदेशा विरुध्द मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदेने पुनर्विलोकन तक्रार क्र.१०७/१९९० मा.औद्योगीक न्यायालय, औरंगाबाद येथे दाखल केली. मात्र सदरचा पुनर्रक्षण अर्ज दि.१८/१२/१९९२ च्या आदेशान्वये अमान्य झाल्याने, जिल्हा परिषदेने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.२८००/१९९४ दाखल केली. सदर याचिकेद्वारे जिल्हा परिषदेने मा.कामगार न्यायालय व मा.औद्योगिक न्यायालय औरंगाबाद, मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे अव्हानीत केले. मात्र सदरची याचिका दि.९/४/२००७ रोजी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथून काढून घेतली. सदर याचिका काढून घेण्यापूर्वी श्री.पतिंगराव यांना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोंली यांनी त्यांच्या दि.१५/९/१९९४ च्या आदेशानुसार पुनर्नियुक्तीचे आदेश दिले.

३. तद्नंतर श्री.पतिंगराव यांनी जिल्हा परिषद सेवेत कालेलकर करारानुसार कायम घेण्याकरिता शासनाकडे पहिला अर्ज दि.३/८/२००९ रोजी केला होता. त्यावर शासनाने दि.२८/९/२०१० च्या पत्रान्वये विभागीय आयुक्त,औरंगाबाद विभाग औरंगाबाद व जिल्हा परिषद हिंगोली यांना पत्र पाठवून श्री.पतिंगराव हे सार्वजनिक बांधकाम विभाग दि.२४/११/२००० व दि.२४/४/२००१ च्या शासन निर्णयाच्या तरतूदीनुसार रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरत नसल्याचे कळविले. त्यानंतर श्री.पतिंगराव यांनी दि.११/११/२०१० रोजी पुन्हा शासनाकडे रोजंदारी अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत विनंती केली होती. त्यांच्या विनंतीची दखल घेतली जात नसल्याने त्यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.७४४१/२०१३ दाखल केली. या याचिकेवर मा.उच्च न्यायालयाने खालील प्रमाणे आदेश दिले.

१) शासनाचे दि.२८/९/२०१० चे पत्र रद्द केले आहे.

२) प्रतिवादी म्हणून या विभागाचे प्रधान सचिव यांना मा.कामगार न्यायालयाच्या दि.११/७/१९९० च्या आदेशाच्या अधिन राहून फेर सुनावणी घेऊन निर्णय देण्याचे आदेश दिले.

३) सदर निर्णय दि.३०/६/२०१४ पूर्वी घेण्यात यावा.

४) श्री.पतिंगराव यांना सुनावणीची नोटीस पाठवून त्यांची बाजू ऐकून घेऊन नंतर निर्णय घ्यावा.

४. मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार तत्कालीन प्रधान सचिव (ग्रा.वि.व पं.रा.) यांनी या प्रकरणी दि.२१/८/२०१४ रोजी सुनावणी घेऊन दि.३/९/२०१४ रोजी आदेश पारित केले. सदर आदेशाचे मुख्य भाग खालील प्रमाणे आहेत-

१. श्री.पतिंगराव हे दि.१/६/१९८३ ते दि.३१/५/१९८६ पर्यन्त रोजगार हमी योजनेवरील कामगार म्हणून कार्यरत असल्याने त्यांना औद्योगिक विवाद, अधिनियम १९५७, कामगार नुकसान भरपाई कायदा १९२२ व इतर तत्सम कायदयाच्या तरतूदी लागू राहणार नाही. म्हणून त्यांना सेवा सातत्य व अनुषंगीक फायदे देय नाही.

५. सदर आदेशा विरुध्द श्री.पतिंगराव यांनी औद्योगिक न्यायालय औरंगाबाद येथे अवमान याचिका दाखल करताना असे स्पष्ट केले की, मा.उच्च न्यायालयाच्या दि.२९/४/२०१४ रोजी आदेश देताना

मा.कामगार न्यायालयाच्या दि.११/७/१९९० च्या आदेशाच्या अधिन राहून निर्णय घेण्याचे आदेश दिले असतांना सदर आदेश डावलून या आदेशाच्या विरोधात निर्णय दिला आहे. मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे अवमान याचिका दाखल केली. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार शासनाने शपथ पत्र देखिल दाखल केले होते. मा.उच्च न्यायालयाने दि.२५/२/२०१५ रोजी अवमान याचिके प्रकरणी आदेश दिले असून या प्रकरणांत जाणीवपूर्वक वा स्वच्छेने मा.न्यायालयाचा अवमान करण्यासारखी बाब आढळून आली नसल्याने सदर याचिका खारीज केली.

६. मात्र याच कालावधीत रिट याचिका क्र.८७५६/२०१४- श्री.पंतिगराव, यांनी दाखल केली. ही याचिका देखिल मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी, दि.२५/२/२०१५ रोजी निकाली काढली. मा.उच्च न्यायालयाने या प्रकरणात दिलेले आदेश पुढील प्रमाणे आहेत:-

१) या आदेशात आव्हानित केलेली तत्कालीन प्रधान सचिव यांचे दि.३/९/२०१४ चे आदेश रद्द केले.

२) श्री.पतिंगराव यांना मा.कामगार न्यायालय दि.११/७/१९९० च्या आदेशानुसार सर्व फायदे देण्याचे आदेश दिलेले आहे. त्याच बरोबर श्री. पतिंगराव यांच्या नियुक्तीच्या तारखेचा विचार करुन त्यांना कालेलकर करार लागू करणेबाबत देखिल आदेश दिलेले आहे. ही कार्यवाही पुढील सहा महिन्यात पूर्ण करावयाची आहे.

७. या संदर्भात संदर्भाधीन पत्राने विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग औरंगाबाद, यांचे कार्यालयाकडून प्राप्त झालेला प्रस्ताव पहाता असे स्पष्ट होते की, श्री.पतिंगराव यांच्या प्रथम नियुक्तीचा दि.१/६/१९८४ असा दर्शाविलेला आहे. ही नेमणूक त्यांची रोजगार हमी योजनेवरील रोजंदारी कर्मचारी म्हणून तोंडी आदेशानुसार झालेली आहे. आणि त्यानंतर चौकीदार म्हणून रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव सादर झालेला आहे.

८. प्राप्त प्रस्तावानुसार त्यांना दि.१/६/१९८६ पासून रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे आहे असे स्पष्ट केले आहे. श्री.पतिंगराव यांना दि.१५/९/१९९४ च्या आदेशानुसार जिल्हा परिषद हिंगोली यांनी पुनर्नियुक्ती दिली आसल्याने ते त्या दिवसापासून सातत्याने सेवेत कार्यरत आहे. श्री पतिंगराव यांच्या CRT बाबतचा प्रस्ताव तपासला असता असे निदर्शनास येते की, श्री पतिंगराव यांची प्रथम नेमणूक ही दि.१.६.१९८३ पासुन रोजंदारी कर्मचारी म्हणून झाली होती. ही बाब मा.कामगार न्यायालयाने त्यांच्या दि.११.७.१९९० च्या आदेशात स्पष्ट केलेली आहे. अशा परिस्थितीत मा.कामगार न्यायालयाने दि.११.७.१९९० चे आदेश व मा.उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.८७५६/२०१४ मध्ये दि.२५.२.२०१५ रोजी दिलेले आदेश पहाता श्री पतिंगराव यांची सेवा त्यांच्या प्रथम नियुक्तीच्या दिनांकापासून म्हणजे दि.१.६.१९८३ पासून विचारात घ्यावी लागणार आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२४/४/२००१ च्या शासन निर्णयानुसार श्री.पतिंगराव यांना सेवा सातत्य दिलेले असल्याने त्यांना दि.१/६/१९८८ पर्यंत ५ वर्षे होत आहे. दि.१/६/१९८८ पासून मा.न्यायालयाच्या आदेशानुसार रोजंदारी नियमित अस्थायी आस्थापनेवर घेणे क्रमप्राप्त आहे.

९. मा.उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेली रिट याचिक ८७५६/२०१४ मध्ये दिलेले आदेश पहाता. श्री.पतिंगराव यांच्या तक्रारीस अनुसरुन मा.कामगार न्यायालयाने दि.११/७/१९९० रोजी जे आदेश दिलेले आहे. त्यानुसार सर्व फायदे दयावयाचे आहे. त्यानुसार कालेलकर करारानुसार रोजंदारी अस्थायी आस्थापनेवर आणावयाचे आहे.

१०. मा.न्यायालयाचे आदेश पहाता श्री.पतिंगराव यांना दि.१/६/१९८८ पासून रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेणे योग्य राहील. तसेच मा.कामगार न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार दि.१/६/१९८६ पासूनचे मागील सर्व थकीत वेतन देणे आवश्यक आहे. त्यामुळे खालील मुद्दयावर निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

१) मा.कामगार न्यायालयने तक्रार क्र. (ULP) १२६/८६ मध्ये दि.११/७/१९९० रोजी दिलेल्या आदेशानुसार श्री.पतिंगराव यांना यापूर्वीच सेवेत घेतले असले तरी त्यांना वरिल आदेशानुसार दि.१/६/१९८६ पासूनच्या वेतनाची थकबाकी देण्यात यावी.

२) श्री.पतिंगराव यांना दि.१/६/१९८८ पासून चौकीदार या पदावर रोजंदारी अस्थायी आस्थापनेवर घेण्यात यावे.

## शासन निर्णय:-

रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ /४/२००१ मधील तरतूदी विचारात घेऊन तसेच मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांनी रिट याचिका क्र.८७५६/२०१४ मध्ये दि.२५/२/२०१५ रोजी दिलेले आदेश विचारात घेऊन सोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे वाचा क्र.२ येथील प्रस्तावातील श्री. यशवंत गंगाराम पतिंगराव, “रोजंदारी मजूर” या कर्मचाऱ्याला “चौकीदार” या पदावर रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मधील रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्र.६ मधील पदावर व रकाना क्र.७ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे.

२. शासनाच्या या निर्णयानुसार कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या.कालेलकर कराराच्या तरतूदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार करण्यांत यावे. तसेच मा.कामगार न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार दि.१/६/१९८६ पासूनची सर्व मागील थकीत वेतन देणे आवश्यक आहे.

१) जिल्हा परिषद, हिंगोली यांनी श्री.पतिंगराव यांना दि.१/६/१९८६ पासूनच्या वेतनाची थकबाकी व दि.१/६/१९८८ पासून त्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापर्यन्तच्या वेतनवाढीतील फरकाची रक्कम ( सर्व प्रकारच्या भत्यांसहित ) ही त्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

२) सदर कर्मचाऱ्यांची रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून सन-२०१५-२०१६ या आर्थिक वर्षापासून त्या-त्या वर्षाच्या जून महिन्यात संबंधित कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीत दहा (५) समान हप्त्यात जमा करण्यात यावी व प्रत्येक हप्ता त्यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा झाल्यापासून ३ वर्षापर्यंत सदर रक्कम त्या कर्मचाऱ्यास खात्यातून काढता येणार नाही.

३. वर नमूद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचाऱ्यांकडून अथवा दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसाकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यांत येणार नाही अशाप्रकारचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील.

४. संबंधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयान्वये कर्मचाऱ्याला चालू आर्थिक वर्षात अदा करावा लागणारा खर्च मंजूर अनुदानातून करावयाचा आहे.

५. रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, सदर आदेश कर्मचाऱ्यांस मान्य नसल्यास त्यांनी त्याबद्दलचे लेखी प्रतिवेदन त्याला (व्यक्तीनिहाय) आदेश मिळाल्यापासून तीन महिन्यात सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्याचे काढलेले (व्यक्तीनिहाय) आदेश अंतिम समजण्यात येतील व त्यानंतर त्याची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

६. अस्थायी आस्थापनेवर रुपांतरित झालेले पद संबंधित पदधारक ज्या दिनांकापर्यंत सेवेत असतील त्या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यात येत आहे.

७. सोबतच्या परिशिष्ट-अ मधील कर्मचाऱ्याच्या यादीमध्ये रोजगार हमी योजनेतील व जिल्हा परिषदेच्या पाणीपुरवठा विभागातील तसेच जिल्हा परिषद निधीतून ज्यांचे वेतन व भत्ते दिली जातात अशा कर्मचाऱ्यांचा समावेश नाही याची खात्री जिल्हा परिषदेने करावी.

८. संबंधित रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणलेल्या प्रत्येक पदाकरिता विहित असलेली वयोमर्यादेची अट व सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

९. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल, २००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

१०. सदर चौकीदार कर्मचाऱ्यांचा वेतनावरील खर्च लेखाशिर्ष २०२७-२०२७ कार्यव्ययी आस्थापना अनुदान या लेखाशीर्षा खाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१०१६३२१९५२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Eknath Kulkarni

Digitally signed by Anil Eknath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Anil Eknath Kulkarni
Date: 2015.08.14 16:59:31 +05'30'

**अ.ए.कुलकर्णी**
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
२. मा.राज्यमंत्री, (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
३. प्रधान सचिव (ग्रा.वि.व पं.रा.) बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१
४. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
५. सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
६. विभागीय आयुक्त,विभागीय आयुक्त यांचे कार्यालय,औरंगाबाद विभाग औरंगाबाद,
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,औरंगाबाद,
८. महालेखापाल,महाराष्ट्र-१ मुंबई/ महाराष्ट्र-२,नागपूर,
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हिंगोली,
१०. वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
११. ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव,अवर सचिव,
१२. कक्ष अधिकारी ,आस्था.७,८,९, १२ व १४ ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई४०० ०३२,
१३. निवड नस्ती, कार्यासन (आस्था.१०)

परिशिष्ट-"अ"

शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.काव्यआ-६६१५/प्रक्र-१६२/आस्था-१०
दिनांक-१४ ऑगस्ट,२०१५

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | आस्थापनेचा प्रकार रोजंदारी/ कार्यव्ययी | नेमणूकीचा पद | विभागाचे नांव | रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाच्या पदाचे नांव | ज्या दिनांकापासून रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे आहे तो दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १. | श्री.यशवंत गंगाराम पतिंगराव | रोजंदारी | रोजंदारी मजूर | लघु सिंचन उप विभाग, जि.प.हिंगोली | चौकीदार | ०१/०६/१९८८ |